अस्वच्छ व्यवसायात काम करणाऱ्या पालकांच्या मुलांना भारत सरकार मॅट्रिकपूर्व शिष्यवृत्ती योजनेंतर्गत कचरा गोळा करणे/उचलणे हा व्यवसाय करणाऱ्या पालकांच्या मुलांचा समावेश करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन
## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः इबीसी -२०१३/प्र.क्र.१९१/शिक्षण-१

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
तारीख: २७ ऑगस्ट, २०१४

वाचा -

१) शासन परिपत्रक सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : इबीसी २०००/७४/प्र.क्र.१३१/मावक-२, दिनांक ३०.०६.२०००
२) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : इबीसी २००८/प्र.क्र.६२/मावक-२, दिनांक १२.१२.२००८, दिनांक १५.०५.२००८, दिनांक १७.०३.२००९,
३) सामाजिक न्याय व अधिकारीता मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.११०३६/४१/२०१२-SCD-V, दि.०७.०५.२०१३
४) सामाजिक न्याय व अधिकारीता मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.११०१४/०३/२०१३-SCD-V, दि.०५.०९.२०१३
५) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. सकआ/शिक्षण/अव्यशि सुधारणा/१३-१४/का-४/५४६, दि.२५.०२.२०१४

प्रस्तावना :-

अस्वच्छ व्यवसायात काम करणाऱ्या पालकांच्या मुलांना भारत सरकार मॅट्रिकपूर्व शिष्यवृत्ती योजना राज्यात १९७७-७८ पासून सुरु करण्यात आली आहे. सद्य:स्थितीत हाताने मेहतर काम करणाऱ्या व्यक्ती (manual scavengers), अस्वच्छ व्यवसायाशी संबंधीत सफाईगार, कातडी कमावणारे (Tanners) व कातडी सोलणारे (Flayers) हा व्यवसाय करणाऱ्या पालकांच्या मुलांना सदर योजनेचा लाभ देण्यात येत आहे. केंद्र शासनाने दि.०७.०५.२०१३ च्या पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसार सदर योजनेची व्याप्ती वाढवून त्यामध्ये कचरा गोळा करणे/ उचलणे (waste picking / collecting) हा व्यवसाय करणाऱ्या पालकांच्या मुलांचा देखील शिष्यवृत्तीसाठी समावेश केला आहे. त्यानुसार सदर घटकातील पालकांच्या मुलांनाही शिष्यवृत्ती लागु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अस्वच्छ व्यवसायात काम करणाऱ्या पालकांच्या मुलांना भारत सरकार मॅट्रिकपूर्व शिष्यवृत्ती योजनेंतर्गत केंद्र शासनाने दि.०७.०५.२०१३ च्या पत्रान्वये कचरा गोळा करणे/ उचलणे (waste picking / collecting) हा व्यवसाय करणाऱ्या पालकांच्या मुलांचा देखील शिष्यवृत्तीसाठी समावेश केला आहे. त्यानुसार राज्यातील सदर व्यवसाय करणाऱ्या पालकांच्या मुलांना शिष्यवृत्ती लागू करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेंतर्गत अस्वच्छ व्यवसाय करत असल्याबाबतचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक आहे. त्यानुसार कचरा गोळा करणे/ उचलणे (waste picking / collecting) हा व्यवसाय करणाऱ्या पालकांच्या संदर्भात केंद्र शासनाच्या राष्ट्रीय स्वास्थ बिमा योजनेमधील लाभासाठी जी कागदपत्रे ग्राहय धरलेली आहेत, ती कागदपत्रे या योजनेंतर्गत शिष्यवृत्तीच्या लाभासाठी ग्राहय राहतील. त्या अनुषंगाने सविस्तर कार्यपध्दतीबाबतच्या सूचना आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी द्याव्यात.

३. उपरोक्त परिच्छेद क्र.२ मध्ये नमूद केलेल्या कागदपत्रांव्यतिरिक्त सदर योजनेच्या इतर अटी व शर्ती पूर्वीप्रमाणेच राहतील.

४. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या (अनौपचारिक संदर्भ क्र.६१६/व्यय-१४, दि.११.०८.२०१४) सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१४०८२७१५४७२३९४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramhari Dagdu Shinde

Digitally signed by Ramhari Dagdu Shinde
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ramhari Dagdu Shinde
Date: 2014.08.27 15:44:09 +05'30'

**(रा.द. शिंदे)**
**सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

२) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव

३) मा. मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव

४) मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव

**५)** मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

६) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय मुंबई.

७) सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय मुंबई.

८) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई

९) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,

१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषद

११) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, मुंबई/पुणे/नागपूर/नाशिक/अमरावती/औरंगाबाद/ लातूर

१२) सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद

१३) उपसचिव/ अवर सचिव (शिक्षण-१), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई

१४) कार्यासने- विघयो/ अर्थसंकल्प, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई

१५) शिक्षण -१ (निवडनस्ती)